**ज्येष्ठ साहित्यिक/गायक/संगीतकार पु.ल. देशपांडे, ग. दि. माडगुळकर व सुधीर फडके यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्ताने आयोजित करावयाच्या विविध कार्यक्रमास मंजूरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण - ८२१८/प्र. क्र.२५७ /सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ६ डिसेंबर, २०१८

**वाचा :-** १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण-८२१८/प्र.क्र.७९/ सां.का.४, दि. १ सप्टेंबर, २०१८ व दि. २६ सप्टेंबर,२०१८

२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. संकीर्ण ८२१८ / प्र.क्र.२२२ / सां.का.४, दिनांक २५ ऑक्टोबर, २०१८

३) मराठी भाषा विभागाचे ज्ञापन क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१७/२०१८/भाषा-३, दि.२७ सप्टेंबर, २०१८

**प्रस्तावना :-**

सन २०१८-१९ हे ख्यातनाम लेखक, नाटय व चित्रपट अभिनेते पु.ल. देशपांडे, विख्यात कवी, पटकथा, संवाद लेखक व गीतकार ग.दि.माडगूळकर व जेष्ठ संगीतकार गायक सुधीर फडके यांचे जन्मशताब्दी वर्ष आहे. या महनीय व्यक्तींच्या कार्याचा गौरव व्हावा यास्तव सन २०१८-१९ हे वर्ष जन्म शताब्दी वर्ष साजरे करण्याबाबत मा. मंत्री (वित्त) यांनी सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पिय भाषणात घोषणा केली होती. त्यानुषंगाने या महनीय व्यक्तींच्या सन्मानार्थ त्यांच्या जन्म शताब्दी वर्षानिमित्त आयोजित करावयाच्या विविध कार्यक्रमांची रुपरेषा ठरविण्यासाठी उपर्निर्दिष्ट दिनांक १ सप्टेंबर, २०१८ व दि. २६ सप्टेंबर, २०१८ च्या शासन निणर्यान्वये समिती गठित करण्यात आली आहे. तसेच, कार्यक्रमांचे आयोजन करण्यासाठी उपर्निर्दिष्ट दिनांक २५ ऑक्टोबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये कार्यकारी समिती गठित करण्यात आली आहे. सदर कार्यक्रम सांस्कृतिक कार्य विभाग व मराठी भाषा विभाग यांच्या संयुक्त विद्यमाने आयोजित करण्यात येणार आहेत. समितीने शिफारस केलेल्या कार्यक्रमांना मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. यासंदर्भात शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

ख्यातनाम लेखक, नाटय व चित्रपट अभिनेते पु.ल. देशपांडे, विख्यात कवी, पटकथा, संवाद लेखक व गीतकार ग.दि.माडगूळकर व जेष्ठ संगीतकार गायक सुधीर फडके यांच्या सन २०१८-१९ या जन्मशताब्दी वर्षा निमित्त आयोजित होणा-या खालील कार्यक्रमांना मान्यता देण्यात येत आहे. आवश्यकतेनुसार कार्यक्रमांच्या संख्येत व स्वरुपात बदल करण्यात येईल.

| अ.क्र. | कार्यक्रम | प्रत्येक कार्यक्रमाचा अंदाजित खर्च (रु. लक्ष) | कार्यक्रमांची संख्या | एकूण अंदाजित अपेक्षित खर्च (रु. लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १ | गीत रचना, गायन व अभिनय कार्यशाळा | १.०० | १०० | १००.०० |
| २ | सांस्कृतिक कार्यक्रम | १०.०० | १० | १००.०० |
| ३ | ग.दि.मा. व बाबुजींच्या जीवनावर आधारीत प्रदर्शन | ५०.०० | २ | १००.०० |
| ४ | पु.ल, ग.दि.मा. व बाबुजींच्या जीवनावर आधारीत प्रदर्शन विविध शहरात फिरविणे | -- | १२ | १५.२० |
| ५ | Stand Up Comedy स्पर्धा व कार्यक्रम | ३५.०० | १ | ३५.०० |
| एकुण | | | | ३५०.२० |

२. मराठी भाषा विभागाने उपर्निर्दिष्ट दिनांक दि.२७ सप्टेंबर, २०१८ च्या ज्ञापनान्वये मराठी भाषा विभागाच्या मागणी क्र. झेडएफ-०१, मुख्य लेखाशिर्ष २०५२ सचिवालय-सर्वसाधारण सेवा, ०९०, सचिवालय, (००) (०४) मराठी भाषेच्या प्रचार व प्रसारासाठी हाती घ्यावयाचे उपक्रम (कार्यक्रम), ५० इतर खर्च २०५२५२३२ या लेखाशिर्षाखाली रू.२,२५,००,०००/-(रू. दोन कोटी पंचवीस लक्ष फक्त) इतका निधी जन्मशताब्दी कार्यक्रमाच्या आयोजनासाठी या विभागास अभिहस्तांकीत केला आहे. त्यानुषंगाने उपरोक्त नमूद कार्यक्रमांपैकी अ.क्र.१, २ व ४ मध्ये नमूद कार्यक्रमाचा खर्च मागणी क्र. झेडएफ-०१, मुख्य लेखाशिर्ष २०५२ सचिवालय-सर्वसाधारण सेवा, ०९०, सचिवालय, (००) (०४) मराठी भाषेच्या प्रचार व प्रसारासाठी हाती घ्यावयाचे उपक्रम( कार्यक्रम ),५० इतर खर्च २०५२५२३२ या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर प्रकरणी लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे

४. तसेच अ.क्र.३ व ५ मध्ये नमूद कार्यक्रमाचा खर्च मागणी क्र.झेडडी-२, प्रधान लेखाशिर्ष २२०५ कला व संस्कृती यांचे प्रचालन, (०२) (०२) राज्य, नृत्य, नाटय, तमाशा व संगीत महोत्सव(२२०५ १५०७) ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. सदर प्रकरणी, संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी व लेखाधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय, समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभागाच्या शासन निर्णय क्र. डीसीए-१३७६/८४५७-बारा, दिनांक ८ मार्च, १९७७ अन्वये या विभागास असणा-या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०६१७०३०८५१२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
Date: 2018.12.06 17:07:44 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
३. मा.मंत्री(सांस्कृतिक कार्य) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२
५. प्रधान सचिव(सांस्कृतिक कार्य विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२
६. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
७. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
८. सह सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
९. उप सचिव (सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२
१०. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
११. मा. अध्यक्ष, साहित्य व संस्कृती मंडळ, मुंबई
१२. संचालक, मराठी भाषा संचालनालय, मुंबई
१३. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंबई
१४. संबंधित सर्व अशासकीय सदस्य (संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्यामार्फत)
१५. महालेखापाल, मुंबई/नागपूर (लेखा व अनुज्ञेयता १-२ / ले.प.) महाराष्ट्र राज्य
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१८. निवड नस्ती, सां.का.४